**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम हिंगोली (१), आणि अमरावती (२) ठिकाणी जिल्हा/उपजिल्हा/स्त्री रूग्णालय अशा एकूण ०२ रूग्णालयांचे बांधकाम करण्यासाठी अनुदान ( केंद्र व राज्य हिस्सा ) वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अ.वि.वि-२०२०/ प्र.क्र.१९/का-७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२

तारीख: २९ मार्च,२०२५

**संदर्भ :-**

१. संचालक आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र जा.क्र.संआसे/कक्ष-७ अ/टे-८/अल्पसंख्याक विकास विभाग/निधी/७९१/२०२० दिं.१७/०२/२०२०.

२. सह सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.३७/आ-३, दि.२४/०२/२०२०.

३. अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्या ३० व्या Empowered Committee च्या बैठकीचे इतिवृत्त दि.१२/०१/२०२१.

४. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. १३/७/२०२०- MsDP-MOMA, दि.०१/०२/२०२१.

५. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. अविवि-२०२०/प्र.क्र.१९/का-७, दि.२२.०३.२०२१.

६. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.अ.वि.वि.-२०२०/प्र.क्र.२७/ का. ७, दि. २२.०४.२०२२

७. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.अ.वि.वि.-२०२०/प्र.क्र.२८/ का. ७, दि. २६.०४.२०२२

८. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.अ.वि.वि.-२०२०/प्र.क्र.३१/ का. ७, दि. २६.०४.२०२२

९. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र. अविवि-२०२०/प्र.क्र.१९/का-७, दि.२८.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) गठित शक्तिप्रदान समितीने दि.२८/१२/२०२० रोजी झालेल्या ३० व्या बैठकीत **हिंगोली व अंजनगाव सुर्जी, अमरावती** या ठिकाणी रूग्णालय बांधकामासाठी रू. **६५६०.२३/- लाख** इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिल्याचे संदर्भ क्र.४ येथे नमुद दि.०१/०२/२०२१ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. सदर प्रस्तावास केंद्र : राज्य हिस्सा हा ६०:४० असून यामध्ये **केंद्र शासनाचा एकूण हिस्सा रु.३९३६.१० लाख व राज्य शासनाचा एकूण हिस्सा रू.२६२४.९२ लाख** असा इतका आहे.

२. संदर्भ क्र.५ व ९ अन्वये विभागामार्फत अमरावती-०१ (अंजनगाव सुर्जी ५० खाटांचे रुग्णालय) व हिंगोली-०१ (स्त्री रुग्णालय १०० खाटांचे) रूग्णालये बांधकामाकरीता केंद्र हिश्श्यातील रू. **१९६८.०६** /- लाख तसेच राज्य हिश्श्यातील एकूण रू. **१३१२.०६५**/- लाख असा एकूण (केंद्र + राज्य) रू. **३२८०.१२५ /- लाख इतका निधी विहित अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यात आला आहे.**

३. सन २०२२-२३ पासून केंद्र शासनाकडून प्रकल्पनिहाय निधी वितरीत करण्यात येत नाही. केंद्र शासनाकडून एखाद्या प्रकल्पाकरीता अगोदरच वितरीत करण्यात आलेला निधी राज्य शासनाकडे उपलब्ध असेल तर उपलब्ध असलेला निधी गरजेनुसार दुसरा प्रकल्प पूर्ण करण्याकरीता वापरून, प्रकल्प विहित वेळेत पूर्ण करण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

४. सदर मार्गदर्शक सूचना विचारात घेता, प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत अंजनगाव सुर्जी, जि. अमरावती व जि. हिंगोली अशा एकूण ०२ रूग्णालये बांधकामाकरीता केंद्र हिश्श्यातील रू. **९८४.०२५**/- लाख तसेच राज्य हिश्श्यातील एकूण रू. **६५६.०४२५**/- लाख असा एकूण (केंद्र + राज्य) रू. **१६४०.०६७५** /- लाख इतका निधी योजनेच्या Single Nodal Account मध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून PFMS प्रणालीव्दारे प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना मंजूर करून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत अंजनगाव सुर्जी, जि. अमरावती व जि. हिंगोली अशा एकूण ०२ रूग्णालये बांधकामाकरीता केंद्र हिश्श्यातील रू. **९८४.०२५**/- लाख तसेच राज्य हिश्श्यातील एकूण रू. **६५६.०४२५**/- लाख असा एकूण (केंद्र + राज्य) रू. **१६४०.०६७५** /- लाख इतका निधी योजनेच्या Single Nodal Account मध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून PFMS प्रणालीव्दारे प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना खालील तक्त्यातील स्तंभ क्र (८) व (९) प्रमाणे मंजूर करून वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**(रु. लाखात)**

| अ.क्र | गट/शहर | प्रकल्प किंमत | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | वितरीत केलेला निधी/हिस्सा | | वितरीत करावयाचा हिस्सा (रू. लाखात) | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | केंद्र (स्तंभ क्र.४ चे ५० % प्रमाणे) | राज्य (स्तंभ क्र.५ चे ५० % प्रमाणे) | केंद्र (स्तंभ क्र.४ चे २५ % प्रमाणे) | राज्य(स्तंभ क्र.५ चे २५ % प्रमाणे) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | अंजनगाव सुर्जी | २३१६.५७ | १३८९.९ | ९२६.६७ | ६९४.९६ | ४६३.३१५ | ३४७.४७५ | २३१.६६७५ |
| २ | हिंगोली | ४२४३.६५ | २५४६.२ | १६९७.५ | १२७३.१ | ८४८.७५ | ६३६.५५ | ४२४.३७५ |
| | | **६५६०.२३** | **३९३६.१** | **२६२४.१३** | **१९६८.०६** | **१३१२.०६५** | **९८४.०२५** | **६५६.०४२५** |

२. केंद्र शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) व्दारे निधी वितरीत करण्यास सुरूवात करण्यात आली आहे. त्यानुषंगाने,

- प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना असून PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम या योजनकरीता Single Nodal Agency **म्हणून अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय** यांची नियुक्ती करण्यात आली आहे.
- तसेच सदर योजनेचे SNA खाते स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आले आहे. सदर योजना PFMS प्रणालीवर Map करण्यात आली आहे.

३. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमकरीता केंद्र शासनाकडून वितरीत केलेला व त्यासमरूप वितरीत करावयाचा राज्य हिश्श्यातील निधी योजनेच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा, मुंबई येथे उघडण्यात आलेल्या SNA खाते **क्र. ४०५३३३४५६७८ व IFSC CODE- SBIN००६१५२४ खात्यावर जमा करण्यात आला आहे**. जमा करण्यात आलेल्या योजनेच्या SNA खात्यामधून उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र. (०८) व (०९) प्रमाणे मंजूर करण्यात आलेला केंद्र व राज्य हिश्यातील दुसऱ्या टप्यातील उर्वरीत **रू. १६४०.०६७५/- लाख इतका निधी PFMS प्रणालीव्दारे** प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत **प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना वितरीत करण्यात यावा.**

४. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादित .C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधितांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित अंमलबजावणी अधिकारी यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील.

५. **प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई** यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत अंमलबजावणी यंत्रणेकडून प्राप्त विहित नमुन्यातील निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR). (अद्ययावत छायाचित्रासह) शासनास सादर करावीत.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३. दि. १२ एप्रिल, २०२३ व २५ जुलै, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३२९१४५१०२७९१४ स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VISHAKHA SACHIN ADHAV

Digitally signed by VISHAKHA SACHIN ADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b2ad90146c0c24582e5f69373fdb00dd8bff89e962d3f5d3bb153e589b39cc43, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=65EF4533476D0EA1DB9995A9B28EDC4173C3B94922081D293614536B5BEAD664, cn=VISHAKHA SACHIN ADHAV
Date: 2025.03.29 14:51:54 +05'30'

**(विशाखा आढाव)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई.

३. आयुक्त, आरोग्य अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,राआसो,मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. प्रशासकीय अधिकारी, सहसंचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन)
६. सहसंचालक आरोग्य सेवा (प्रा.आ.केंद्र-जि.प.स्तर),
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, संबधित विभागीय मंडळ.
८. विभागीय आयुक्त, अमरावती/छत्रपती संभाजीनगर.
९. जिल्हाधिकारी,अमरावती/हिंगोली.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
१२. अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय आरोग्य अभियान,राज्य आरोग्य सोसायटी,मुंबई.
१३. कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय आरोग्य अभियान, अमरावती/हिंगोली.
१४. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रूग्णालय, अमरावती/हिंगोली
१५. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१६. नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१७. निवड नस्ती, का.७